**महाराष्ट्र शासन**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग
शासन निर्णय क्र.बीयुडी-२०११/प्र.क्र.२४७/प्रशासन-१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १५ जुलै, २०११

*वाचा* : (१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.मआख-१०.०७/प्र.क्र.६५/२००७/विनियम, दि.२२.०१.२००८
(२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-१०११/प्र.क्र.३/कोषा.प्र.५, दि.०५.०२.२०११
(३) बाष्पके संचालनालयाचे पत्र क्र.एसबी-४/लेखाशाखा/२०११/१४०२४, दि.२३.०६.२०११

**शासन निर्णय :**

बाष्पके संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयाकरिता रु.५००/- इतके स्थायी अग्रीम मंजूर आहे. तथापि, संदर्भाधीन क्र.(२) येथील शासन निर्णयानुसार रु.१०००/- पर्यंतची देयके अधिदोन व लेखा कार्यालयात / कोषागारात स्वीकारण्यात येत नसल्यामुळे बाष्पके कार्यालयास मार्च, २०११ पासून स्थायी अग्रीमाची देयके अधिदान व लेखा कार्यालयात सादर करता आलेली नाहीत. ही वस्तुस्थिती तसेच सध्याच्या महागाईच्या काळात वस्तूंचे वाढलेले भाव लक्षात घेता, बाष्पके संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयासाठी स्थायी अग्रिमाची मर्यादा वाढवून रु.२,५००/- (रुपये दोन हजार पाचशे फक्त) इतके स्थायी अग्रीम मंजूर करण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.मआख-१०.०७/प्र.क्र.६५/२००७/विनियम, दि.२२.०१.२००८ अन्वये महालेखापालांच्या सल्ल्याशिवाय विभागप्रमुखांच्या कार्यालयासाठी स्थायी अग्रीमाची रक्कम मंजूर करण्याच्या प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारात हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* ह्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०७१५१७४५१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( बा. शि. वानखेडे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

संचालक, बाष्पके संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
महालेखापाल (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), महाराष्ट्र, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग (विनियम), मंत्रालय, मुंबई ३२.
कक्ष अधिकारी (कामगार-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
निवडनस्ती (प्रशासन-१)